**कोषागारातून रोख देय अनुदान**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन अंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी राज्य हिश्श्याचे सर्वसाधारण घटकासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत...

**(लेखाशीर्ष २२१५ २१८९)**

# महाराष्ट्र शासन
## पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०१९/प्र.क्र. ६०४/पापु-१६

७ वा मजला, जी.टी.रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीखः १३ जानेवारी,२०२०.

**वाचा -**

**१)वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:** अर्थसं २०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३,दिनांक ०१ एप्रिल,२०१९.
**२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:** अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दिनांक ०८ जुलै, २०१९.
**३) जिल्हा परिषद, चंद्रपूर यांचे पत्र क्रमांक:** जिपास्वमि/लेखा/८३०/२०१९, दिनांक २१ डिसेंबर, २०१९.
**४) जिल्हा परिषद, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक:** जिपऔ/स्वभामि/कावि/२०१९-२०/३१७, दिनांक ८ नोव्हेंबर, २०१९.
**५) जिल्हा परिषद, नाशिक यांचे पत्र क्रमांक :** जिपना/ जिपस्वमि/स्वभामि/लेशा/१६१/२०१९, दिनांक ९ डिसेंबर, २०१९.

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या (ग्रा.) राज्य हिश्श्याच्या सर्वसाधारण घटकाखाली २२१५ २१८९ या लेखाशीर्षांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता रूपये ६२०.५१०४ कोटी (रूपये सहाशे वीस कोटी, एकावन्न लक्ष, चार हजार) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर मंजूर निधीपैकी रूपये ३७२.२९६२ कोटी (रूपये तीनशे बाहत्तर कोटी, एकोणतीस लक्ष, बासष्ट हजार) इतका निधी वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण (BEAMS) प्रणालीद्वारे वितरणासाठी उपलब्ध करून दिलेला आहे. सदर निधी संबंधीत अंमलबजावणी यंत्रणांना वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

सन २०१९-२० या आर्थिक करिता केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या (ग्रा.) राज्य हिश्श्याच्या सर्वसाधारण घटकाखाली २२१५ २१८९ या लेखाशीर्षांतर्गत रूपये ३७२.२९६२ कोटी (तीनशे बाहत्तर कोटी, एकोणतीस लक्ष, बासष्ट हजार) वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण (BEAMS) प्रणालीद्वारे वितरणासाठी उपलब्ध करून दिलेला आहे. सदर निधीमधून मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद चंद्रपूर, औरंगाबाद व नाशिक यांना त्यांच्या वाचा क्रमांक ३, ४ व ५ अन्वये केलेल्या विनंतीस अनुसरून स्वच्छ भारत मिशन (ग्रा) अंतर्गत सर्वसाधारण घटक (२२१५ २१८९) खालील (वैयक्तिक शौचालय बांधकाम प्रोत्साहन अनुदान व Sanitary Complex याकरिता) राज्य हिस्सा पुढील तक्त्यातील स्तंभ क्रमांक ५ प्रमाणे अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे रोख स्वरूपात मुक्त करण्यात येत आहेत. सदर अनुदान हे सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

(रूपये - लाखात)

| अ.क्र. | जिल्हा परिषद | सर्वसाधारण घटक वैयक्तिक शौचालय बांधकाम प्रोत्साहन अनुदान | Sanitary Compex अनुदान | एकूण |
|---|---|---|---|---|
| *१* | *२* | *३* | *४* | *५ (३+४)* |
| १. | चंद्रपूर | २३२.२२ | १२८.०० | **३६०.२२** |
| २. | औरंगाबाद | १७९७.९४ | ०००.०० | **१७९७.९४** |
| ३. | नाशिक | १५६.११ | ६३.०० | **२१९.११** |
| **एकूण** | | **२१८६.२७** | **१९१.००** | **२३७७.२७** |

०३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) संबंधित जिल्हा परिषदांना या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी,या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

आ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावे. संबंधित जिल्हा परिषदेने/संस्थेने या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

इ) जिल्हापरिषदांनी Sanitary Complex करिताचे सदर अनुदान ग्रामपंचायतींना वितरीत झाल्यावर केंद्र सरकारच्या मार्गदर्शक सुचनांनुसार ग्रामपंचायतींनी त्यांची सहभाग रक्कम भरली आहे याची खात्री करावी.

ई) अट क्र.३-अ आणि ३-आ यांची पुर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२, नागपूर यांच्याकडे जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

उ) सदर रक्कम केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील तरतूदींनुसार तसेच या संदर्भात राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे /आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

ऊ) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल,२०१९ व क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दिनांक ०८ जुलै, २०१९ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करून आवश्यक बाबींची पूर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरीत सादर करावीत.

०४. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ मलप्रणाल व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, (०२) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रम (०२)(०५) स्वच्छ भारत मिशन (कें.पु.यो.) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) ३३, अर्थसहाय्य, (२२१५ २१८९ ) " या लेखाशीर्षाखाली घालावा. सदर अनुदन सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.४४/ अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल,२०१९ व क्र.अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दिनांक ०८ जुलै, २०१९ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल,२०१९ च्या परिपत्रकातील अटी व शर्तींची तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तींची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११०१७०८४३०२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant Krishna More

Digitally signed by Chandrakant Krishna More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=11ac200219edb36f7777ee1101657bea4271090267228122b638d6f2cdedad62, serialNumber=2314cf333e070f9936792bc95890fa89b2f617a931b2b577b703fa858f3df433, cn=Chandrakant Krishna More
Date: 2020.01.13 13:00:32 +05'30'

**(चं.कृ.मोरे)**

अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.राज्यमंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, सर्व.
५. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता).
६. उप सचिव तथा प्रकल्प संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. उपायुक्त, विकास/आस्थापना, सर्व विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.
८. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती सर्व.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
१२.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, (WSSO), बेलापूर, नवी मुंबई.
१३. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा. व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१५.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१६. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (विघयो), मंत्रालय, मुंबई.
१७. नियोजन विभाग, (का.क्र.१४४३), मंत्रालय, मुंबई.
१८. वित्त विभाग, (व्यय-३), मंत्रालय, मुंबई.
१९. कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. निवड नस्ती, कार्यासन पापु-१६, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.